**हिंगोली जिल्ह्यातील औंढा नागनाथ तालुक्यातील योजनाबाह्य रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२१/प्र.क्र.१२६/नियोजन-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक- ११ जानेवारी, २०२२.

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नांदेड यांचे पत्र
जा.क्र.मु. अ. नां/औ/२०२१-२२/आरेखक/१३/प्रस्ताव, दि.०३/१२/२०२१.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नांदेड यांनी संदर्भाधिन पत्रान्वये हिंगोली जिल्ह्यातील औंढा नागनाथ तालुक्यातील योजनाबाह्य रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, हिंगोली यांनी सदर रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजनेमध्ये समाविष्ट करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांचा होणारा वापर विचारात घेता, सदर रस्ते ग्रामीण मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नांदेड यांचा प्रस्ताव विचारात घेऊन हिंगोली जिल्ह्यातील औंढा नागनाथ तालुक्यातील खालील रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | साखळी क्रमांक | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|
| १. | ग्रा.मा.६३ वरुन अजरसौंडा ते नालेगांव जवळा ग्रा.मा.६५ ला मिळणारा रस्ता. | ०/० ते ३/०० | ३.०० कि.मी. | **ग्रामीण मार्ग-११५** |
| | **एकूण** | | **३.०० कि.मी.** | |

परिणामी रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील हिंगोली जिल्ह्यातील ग्रामीण मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत **३.०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (२०७०.६०० + ३.००) म्हणजेच **२०७३.६०० कि. मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०११११६५७२९०६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2022.01.11 16:57:48 +05'30'

**(ग. सं. कचरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नांदेड (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
२) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
३) अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
४) जिल्हाधिकारी, हिंगोली.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हिंगोली.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, हिंगोली
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
८) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) निवडनस्ती.